# किती दूर फेलिपे ?




लेखनः जेनेवीव ग्रे

चित्र: एन ग्रिफैल्कोनी

मराठी: अश्विनी बर्वे

फेलिपे मैक्सिको मध्ये राहत होता. त्याची छोटेशी बुर्रो (गाढवीण) फिलोमिना त्याची मैत्रीण होती. पण जेव्हा फेलिपेच्या कुटुंबाने कर्नल आंजा यांच्या कॅलिफोर्निया अभियानाला जोडण्याचा निर्णय घेतला, फेलिपेच्या कार्लोस काकांनी सांगितले की त्यांना फिलोमिनाला इथेच सोडून जावे लागेल. पण फेलिपेने तिला दुसऱ्या जनावरांच्या मध्ये लपवले.

प्रवास खूप लांबचा आणि मुश्किल होता.प्रवाशांनी खूप त्रास सहन केला. रस्त्यात अनेक प्राणी मेले. पण फेलिपे आणि त्याचे कुटुंब वाचले. फेलोमिना पण वाचली.

इतिहासाचे “आय कॅन रीड” या पुस्तकात कर्नल हुआन बाउस्तीता दे आंजा यांच्या १७७५ चे कॅलिफोर्नियाचे अभियानाबद्दल सांगते. जैनेवीव ग्रे च्या संवेदनशील शब्दात लिहलेली या कथेला एन गीफेल्कोनी च्या चित्रांनी जिवंत केले आहे.

ब्रैड इरविनसाठी

# अनुक्रम



## १. फेलिपे

फेलिपे आपल्या कार्लोस काका आणि मारिया काकू बरोबर राहत होता. आणि आपल्या सहा चुलत भावंडा बरोबर राहत होता.

फिलोमीना त्याची मैत्रीण होती. ती छोटीशी गाढवीण होती.

फिलोमीना खूप आवाज करत असे, पण ती छोटी होती. इतकी छोटी की ती शेतात मदत करू शकत नसे.



कार्लोस काकाने शेतात मका उगवण्याचा प्रयत्न केला. पण जमीन कसदार नव्हती. फेलिपे नेहमीच भुकेला राहत होता. त्याचे चुलत भावंडे सुद्धा. आणि मेक्सिकोतले त्यांच्या गल्लीतले दुसरे लोक सुद्धा भूकेलेच होते.

एक दिवस चौकात

फेलिपे आणि फिलोमीनाने एक ऑफिसर बघितला. जो गर्दीशी बोलत होता.

“मी कर्नल आंज़ा आहे,” ऑफिसरने म्हटले.

“मैक्सिकोचे व्हाईसराय (सूभेदार) ला तीस कुटुंबाची गरज आहे. जे कॅलिफोर्नियात जाऊन राहिला तयार आहेत. जिथे जमीन उपजाऊ आहे. शेतीवाडी आणि पशुपालनासाठी चांगली आहे.

प्रत्येक कुटुंबाला कपडे, जेवण, घोडे आणि पाळीव प्राणी मिळतील. मोफत!

जर घोड्यांवरून प्रवास केला तर कॅलिफोर्नियाला जायला चार महिने लागतील एवढे ते दूर आहे. माझे शिपाई आणि मी तुम्हा लोकांना तिथे घेऊन जाऊ. कोण-कोण यायला उत्सुक आहे?"



''अन्न? कपड़े?''

फेलिपेने कुजबुजत म्हटले. तेव्हा त्याने जोरात म्हटले, "मी येईन!" दुसरे पण ओरडू लागले. "आम्ही पण कॅलिफोर्नियाला येऊ."

फिलोमीनापण ओरडली, ढेंचू - ढेंSSSSS- चूSSSSS!

ती एवढ्या जोरात ओरडली की घोडे घाबरून मागे झाले. आणि डुक्कर ची ची करू लागले.

“या गाढविणीला इथून हलवा!” कर्नल आंज़ा गरजले.



फेलिपे कार्लोसकाकाला बातमी देण्यासाठी घरी धावला. पण कार्लोस काका म्हणाला,

''कॅलिफोर्निया खूप दूर आहे.''

''पण त्याची पर्वा कोणाला आहे?" मारिया काकू म्हणाली.

''इथे आपण  बेडका सारखे राहत आहोत. आपल्याला जिवंत राहायचे असेल तर अन्न आणि कपड्यांची गरज आहे."

म्हणून ते नाव लिहण्यासाठी गेले.

''मी फिलोमीनाला माझ्या बरोबर कॅलिफोर्नियाला घेऊन येईल." फेलिपेने म्हटले.

''बिलकुल नाही!'' कार्लोस काका म्हणाले.

''ती काम करण्यासाठी खूप छोटी आहे.''



‘‘ती कधी मोठी होईल?’’ फेलिपेने विचारले.

‘‘जेव्हा तिचे खांदे तुझ्याएवढे होतील.” कार्लोस काका म्हणाला.

‘‘पण तोपर्यंत तू कॅलिफोर्निया मध्ये असशील.”

ढेंचू - ढेंSSSSS- चूSSSSS!

फिलोमीना गाऊ लागली.तिचे बोलणे फक्त फेलिपेला समजे.

फिलोमीनाला पण त्याच्या बरोबर कॅलिफोर्नियाला जायचं होतं.





## 2. प्रस्थान

“आपल्याला वाळवंट आणि पहाड पार करावे लागतील,” कर्नल आंज़ा यांनी सांगितलं.

“आपल्याला रस्त्यात इंडियन (अमेरिकेचे मूळ निवासी) भेटतील, आणि तसेही त्यांच्याशी आपली मैत्री नाही. प्रवास कठीण आहे.”

शेवटी प्रवासाची पूर्ण तयारी झाली.

कर्नल आंज़ाने प्रवाशांचे प्रमुखपद घेतले, ते पुढे चालले आणि मग त्यांचे शिपाई चालू लागले. नंतर इतर कुटुंब. त्यांच्या मागे अजून शिपाई.त्यांच्या मागे सामान वाहणारे खेचर आणि सगळ्यात शेवटी फिलोमीना।

फेलिपे घोड्यावर स्वार होता. त्याची चुलत भावंडे होसे आणि रुबेन सुद्धा. फेलिपेने फिलोमीनाला शोधलं.

फेलिपेने फिलोमीनाला त्याला
आवाज देतांना ऐकले.
ढेंचू - ढेंऽऽऽऽऽ- चूऽऽऽऽऽ!

घोड़े चमकले, त्यांचे लगाम ताणले गेले. खेचर दचकले त्यांनी सामानच पाडून टाकले. जनावरे घाबरून झाडांमागे लपले.



कारवाँ थांबला.

“त्या बुर्रोला हाकलून लावा.” कर्नल आंज़ा ने रागवून हुकुम दिला. पण एवढा गोंधळ झाला होता की कोणाला त्याचा हुकुम ऐकूच आला नाही. सारे शिपाई जनावरांना एकत्र करण्यात गुंतले होते.

त्या दिवशी दुपारी उशिरा

कर्नल आंज़ाने एका नदीच्या जवळ थांबण्याचा हुकुम दिला. “आम्ही रात्रीसाठी इथेच वस्ती करणार आहोत.” ते म्हणाले.

लोकांनी खेचरावर लादलेले सामान काढले आणि तंबू ठोकले. स्त्रियांनी चुली पेटवल्या आणि स्वयंपाक सुरु केला. मुले जंगलात खेळायला गेली.

फेलिपेने फिलोमीला खेचराबरोबर घास खातांना बघितलं. “माझे तुझ्यावर प्रेम आहे, फिलोमीना,’’ फेलिपेने कुजबुजत तिच्या कानात सांगितले. फिलोमीनाने आपले डोके फेलिपेच्या छातीवर टेकवले.



दुसऱ्या दिवशी सकाळी बिगुल वाजवले.
फिलोमीना त्याच्याबरोबर गाऊ लागली.

“ढेंचू - ढेंSSSSS- चूSSSSS!”

सगळे लोक खडबडून जागे झाले.

‘‘ही बुर्रो एवढी वाईट पण नाही,” कर्नल आंज़ा म्हणाले.

यानंतर, फिलोमीना रोज सकाळी गाऊ लागली,

“उठण्याची वेळ झाली आहे.”

कार्लोस काका सुद्धा

तिच्यावर खुश होते.

काही दिवसानंतर ते एका पहाडाच्या पायथ्याशी पोहचले.

चारी बाजूला उंच उंच खडक होते.

कर्नल आंज़ाला भीती होती की जर इंडियनने हमला केला तर!





“अपाचे (मूळ निवासींचा एक जमाव)

गुप्तहेर त्या खडकांवर जाऊन बघतील,” ते म्हणाले.

या नंतर ते एका दरीतून पुढे गेले. त्या रात्री कोणीच झोपले

नाही. पूर्ण रात्रभर फेलिपेने कान टवकारून ऐकले. अपरिचित लोकांची चाहूल ऐकण्याचा प्रयत्न केला. त्याला वाटले की या काही गुप्तहेरांच्या सावल्या आहेत.

पहाट होताच कारवाँ परत चालू लागला.
कोणीच नाष्टा केला नाही.

"दुपार पर्यंत आपण सुरक्षित होऊन जाऊ,"
कर्नल आंज़ा म्हणाले.

"आपण तेव्हाच खाऊ."

"कॅलिफोर्निया तर एक चांगली जागा असेल!"
मारिया काकू म्हणाली.

"जर आपण तिथे पोहचलो तर,"

कार्लोस काकाने शंका घेत म्हटले.



## ३. इंडियन लोकांचा इलाखा

आता ते एका वाळवंटापर्यंत पोहचले.
ते अनेक आठवडे पुढे चालत राहिले,
त्यांनी अनेक मैल वाळवंट पार केले.

‘‘आपण घरातून मागच्या उन्हाळ्यात निघालो होतो,” फेलिपे म्हणाला.

‘‘आता हिवाळा येणार आहे, पण कॅलिफोर्निया अजून आले नाही.”

“आपण अर्धा रस्ता पार केला आहे,” कर्नल आंज़ा म्हणाले.

‘‘सॅन गॅबरिएल केवळ दोन महिने दूर आहे.” सगळेजण एवढे थकले होते की आता कोणालाच कसलीच पर्वा नव्हती.

“दोन महिने, काय दोन वर्षे काय सगळे एकसारखेच वाटत होते त्यांना.

मारिया काकू बडबडली.



ते एका नदीपर्यंत पोहचले. तिच्या किनाऱ्यावर इंडियन वसलेले होते.

“हे पीमा इंडियन आहेत,” कर्नल आंज़ा यांनी सांगितले. “त्यांचे वर्तन मैत्रीपूर्ण आहे” इंडियन लोकांनी त्यांच्यासाठी खायला आणले.

जेव्हा मारिया काकूला त्यांनी पिण्यासाठी चॉकलेट दिले, तिने एक घोट घेतला आणि ते थुंकून टाकले.

‘‘अपाचे यांच्यापेक्षा चांगले होते,” मारिया काकू चिडून म्हणाली.

काफिल्याने तीन दिवस तिथे काढले. फेलिपेने पाणी भरले, जनावरांची देखभाल करण्यास मदत केली.

कार्लोस काकांना फार आश्चर्य वाटले. “काय फेलिपे आता गवळी झाला आहे काय?” त्यांनी मारिया काकू म्हटले, “आता पुढे आणखीन काय काय होणार आहे?”

एक दिवस

इंडियन लोकांनी जेवण दिले.
फेलिपेने खूप सारा राजमा आणि
मका खाल्ला. तोपर्यंत एका
माणसाने फिलोमिना साठी टरबूज
कापायला मदत केली.
पण फिलोमिनाला ते आवडले नाही.
म्हणून फेलिपेने तिच्या हिश्श्याचे
टरबूज खाऊन टाकले.





## ४. वाळवंट

काफिला आता वाळवंटात पुढे चालू
लागला. थंड हवेमुळे वाळू आणि धूळ
उडत होती. आता जवळपास कुठेही
पाणी नव्हते. जनावरांसाठी घास
सुद्धा नव्हता. फिलोमिनाला खायला
फक्त काही तण मिळाले.



थंडी एवढी होती की

फेलिपे आणि फिलोमीना शेजारी झोपत. म्हणजे थोडी ऊब मिळेल. बाकी जनावरे रात्रभर उभे राहत, भुकेले आणि थंड हवेकडे पाठ करून.



एका सकाळी

फेलिपेला नऊ खेचर मरून पडलेले दिसले.

कर्नल आंज़ा उदास होऊन म्हणाले,

“न चारा, न पाणी”.

पण करिश्मा हा आहे की काही प्राणी अजून जिवंत आहेत.

‘‘जर जनावरे भुकेने मरत आहेत ,”कार्लोस काका म्हणाले, तर माणसं सुद्धा मरू शकतात.”



फेलिपे आपल्या थकलेल्या घोड्याजवळ जात होता. थंड हवा त्याच्या गालावर थपडया मारत होती. त्याने भुकेल्या-तहानलेल्या प्राण्यांना अचानक पडतांना आणि मरतांना बघितले.



त्या रात्री कार्लोस काका म्हणाले,

‘‘आपण कोरड्या नदीत खड्डे खणले पाहिजेत, म्हणजे प्राण्यांना थोडे तरी पाणी मिळेल.”



फेलिपेने फीलोमीनाला म्हटले, “मला आज रात्री पुरुषांना मदत करायची आहे, पण तू गरम राहशील.” त्याने आपल्या चुलत भावडांना विचारले, ‘‘फिलोमीना बरोबर कोण झोपेल?”

‘‘मी!’’ सगळे जोरात बोलले.

फेलिपे पूर्ण रात्रभर काम करत राहिला. पाण्यासाठी खड्डे खणत राहिला. त्याने एक एक करून जनावर पाणी पिण्यासाठी आणले. तो हे विसरून गेला की तो ही किती थकलेला आहे. शेवटी पहाट झाली. तोपर्यंत ९४ प्राणी मेले होते. पण काफिल्याला पुढे जाणे भाग होते.





## ५. अडचणी

फेलिपेला काहीतरी वेगळा दिसत होते. "हे पांढरे पांढरे काय आहे?" त्याने विचारले.

''बर्फ़,'' कर्नल आंज़ा म्हणाले. "तू मेक्सिकोत जिथे राहत होता तिथे तू बर्फ बघितला नाही का?"

त्या रात्री त्या लोकांनी शेकोटी भोवती बसून, अंगावर कांबळे घेऊन रात्र काढली. तरीपण सगळ्यांना खूप थंडी वाजली.



दुसऱ्या दिवशी सकाळी आकाश स्वच्छ होते. फेलिपेने दूर पहाडाकडे बघितले. ते आता बर्फामुळे पांढरे दिसत होते.

''अरे रे! कॅलिफोर्नियामध्ये बर्फ आणि हिमाशिवाय काहीच नाही!"

कार्लोस काका म्हणाले.

''घरी आम्ही गरीब होतो पण कमीत कमी गरम तरी होतो!"

"तुम्हाला परत जावेसे वाटते आहे की काय?" मारिया काकूने डोळे मोठे करत विचारले.



पण फेलिपेला आपल्या खांद्यावर सूर्याची उष्णता जाणवत होती.

"बघा" बर्फ वितळत आहे." रुबेन म्हणाली.

ढेंचू - ढेंSSSSS- चूSSSSS!

फिलोमीनाने आनंद दर्शविला. पहाड समोर होता. त्यातून पाणी झऱ्या सारखे वाहत होते. त्याला हिवाळ्यातल्या घासासारखा सुगंध येत होतो. जो खोऱ्यात उगवला होता. घोड्यांचा वेग वाढला होता.

त्या दुपारी ते पहाडाच्या पायथ्याशी पोहचले. तिथे सगळ्यांसाठी पाणी होते आणि जनावरांसाठी कोवळा घास. “शेवटी आपण आपले उद्‌दिष्ट पूर्ण केलेच!” फेलिपे आनंदाने ओरडला.

फेलिपेने थकलेल्या जनावरांच्या अंगावरचे ओझे उतरवण्यासाठी मदत केली. त्यांना गवतापर्यंत घेऊन गेला. “हा प्रवासाचा कठीण काळ होता.” कर्नल आंज़ा यांनी म्हटले.

‘‘बाकीचा प्रवास आता सहज होईल.”

“देवाचे आभार!” मारिया काकू म्हणाली.





## 6. कॅलिफोर्निया

त्यांनी आठवडाभर आराम केला. मग पहाड चढायला सुरुवात केली. सगळीकडे उंच पहाड आणि हिरवा घास होता. फेलिपेला सुर्यफुल आणि जंगली द्राक्षे मिळाली.नदीचे पाणी सूर्यात चमकत होते. नदीत खूप मासे होते.

‘‘पण कॅलिफोर्निया कुठे आहे?” फिलिपेने विचारले. हेच तर कॅलिफोर्निया आहे,”

कर्नल आंज़ाने म्हटले. आपण जवळजवळ सॅन गॅबरिएल पोहचलो.



''फिलोमीनाकडे तर बघा जरा,'' रुबेन म्हणाली.

''ती मोठी झाली." आता तिचे खांदे फेलिपेच्या उंची इतके झाले," मारिया काकू म्हणाली.



ढेंचू - ढेंऽऽऽऽऽ- चूऽऽऽऽऽ!

फिलोमीना अभिमानाने गाऊ लागली. तिने फेलिपेला आपल्या पाठीवर बसू दिले आणि धावू लागली. तिच्या मासपेशी आता मजबूत झाल्या होत्या. ती गोल गोल चक्कर मारत पळत होती. तिची शान वाढू लागली होती.



“ही आमच्या काऊबॉयची घोड़ी आहे.!”

कर्लोस काका म्हणाले.

जेव्हा आपण नवीन घर बांधू तेव्हा ती ओझे उचलेल.” रुबेन म्हणाली.

“आणि नांगर सुद्‌धा!” कार्लोस काका म्हणाले.

“अरे आरामात!” मारिया काकू म्हणाली.

“आमच्या छोटीकडून कष्ट करून घेऊ नका.” तिने फिलोमीनाचे नाक कुरवाळत म्हटले.

शेवटी काफिला पहाडांच्या रस्त्यातून बाहेर पडला. त्यांच्या समोर हिरव्यागार टेकड्या होत्या. त्या समुद्राच्या लहरीसारखे दिसत होत्या.

सॅन गॅब्रिएल मिशनचे पाद्री त्यांना भेटायला आले.

‘‘आपण शेवटी घरी पोहचलोच,’’

फेलिपेने फिलोमिनाच्या कानात कुजबुजत म्हटले. फिलोमीना गाऊ लागली,

‘‘ढेंचू - ढेंऽऽऽऽऽ- चूऽऽऽऽऽ!’’



## लेखकाच्या लेखणीतून

कर्नल जुआन बॉटिस्टा यांची मोहीम स्पॅनिश मेक्सिकोहून कॅलिफोर्नियाला पाठवण्यात आली होती जेणेकरून तेथील जमीन मार्ग खुला करावा आणि अल्टा कॅलिफोर्निया नावाचा विस्तीर्ण रिकाम्या भागाला लोकवस्ती करावी, जे आजचे कॅलिफोर्निया राज्य आहे. या कथेतील पात्रांप्रमाणेच स्थायिकांनी एप्रिल १७७५ मध्ये कुलियाकन, मेक्सिको सोडले आणि ४ जानेवारी १७७६ रोजी सॅन गॅब्रिएल येथे पोहोचले. 12 कुटुंबे सॅन गॅब्रिएलमध्ये स्थायिक झाली आणि उर्वरित सॅन फ्रान्सिस्को बे येथे गेले आणि 17 सप्टेंबर 1776 रोजी सॅन फ्रान्सिस्को प्रेसिडियोची स्थापना केली. कर्नल अँझा नंतर मेक्सिकोला परतले. पण हे कुटुंब कॅलिफोर्नियातच राहायचे. त्याचे वंशज आजही तेथे राहतात.



## जेनेव्हिव्ह ग्रे

यांचा जन्म जोन्सबर्ग, आर्कान्सा येथे झाला. त्यांनी ॲरिझोना विद्यापीठातून पदव्युत्तर पदवी प्राप्त केली. शिक्षिका म्हणून काम करताना तिने वर्गात वापरण्यासाठी अनेक मुलांची पुस्तके आणि शैक्षणिक साहित्यही तयार केले. मिझ ग्रे यांना दोन प्रौढ मुलगे आणि दोन नातू आहेत - मॅथ्यू आणि रायन. ती सध्या टक्सन, ऍरिझोना येथे राहते.

## ॲन ग्रिफाल्कोनी

यांचा जन्म न्यूयॉर्क शहरात झाला. त्यांनी त्यांच्या स्वत: च्या निर्मिती ट्रॉय ट्रम्पेटसह असंख्य मुलांच्या पुस्तकांचे चित्रण केले आहे. शिक्षक, लेखक आणि चित्रकार मिझ ग्रिफाल्कोनी यांनी मेक्सिकन भारतीय लोकांच्या इतिहासावर संशोधन करण्यासाठी आणि मेक्सिकोभोवती फिरण्यात बरीच वर्षे